**संयुक्त वन व्यवस्थापन कार्यक्रम व संत तुकाराम वनग्राम योजना या राज्य योजनेतंर्गत योजनेचा चालू बाब प्रस्ताव सन २०१०-११**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम २०१०/प्र.क्र.५१/फ-२**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक :-२९.६.२०१०

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/यो/इए/संवव्य/प्र.क्र.१/२२७(१०-११), दि.६.५.२०१०,

२) वित्त विभागाचे परीपत्रक क्र. अंदाज-२०१०/प्र.क्र ७१/२०१०/अर्थ-३, दि.१८.५.२०१०.

**शासन निर्णय:-**

सन २०१०-११ मध्ये संयुक्त वन व्यवस्थापन कार्यक्रमासाठी रु. १०००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर रु. १०००.०० लक्ष निधीपैकी सन २०१०-११ या वर्षातील संत तुकाराम वनग्राम योजनेच्या राज्य व जिल्हास्तरीय बक्षिसाची रक्कम तसेच पुरस्कार वितरण समारंभ आयोजित करणे व प्रसिध्दीकरिता रु. ६५.०० लक्ष व सन २००९-१० च्या राज्यस्तरीय बक्षिसासाठी तसेच पुरस्कार वितरण समारंभ करण्यासाठी रु. २७.०१ लक्ष असा एकूण रु. ९२.०१ लक्ष निधी वितरित करण्यास अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भ क्र.१ येथील दि.६.५.२०१० च्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर एकूण रु.९२.०१ लक्ष निधी प्रस्तावित कामावरच खर्च होईल व त्यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

संदर्भ क्र. २ वरील वित्त विभागाच्या परिपत्रकातील सुचनेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी विवरणपत्रानुसार निधी खर्च करण्यात यावा.

सदर रक्कम ही मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन १०१(११) वनसंरक्षण, विकास व पुनर्निमिती पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (११)(१०) ग्रामपरीसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानामधून खर्च करण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र/१०४०/प्र.क्र.४६/ २००१/ विनियम, दिनांक ११.७.२००१ भाग पहिला उपविभाग -३ परिच्छेद २७ (२) ब अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५२/अर्थ-६, दि.९.६.२०१० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००७०११६१८२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**सही/-**
**( प्रफुल्ल ठाकूर)**
**कार्यासन अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति** :-

प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर

**प्रतिलिपी:-**

१)प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव)महाराष्ट्र राज्य, नागपूर

२)अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक/मुख्य वनसंरक्षक /वनसंरक्षक

४)महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

५)नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

६) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-६ मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

७) ब-१ कार्यासन, ,म.व व.वि.,मंत्रालय,मुंबई-३२.

८) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग.